कुटुंब कल्याण कार्यक्रमाच्या अंमलबजावणी करिता निर्माण केलेल्या ३७ अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२२ ते दि.३१/०८/२०२२ या कालावधी करिता मुदतवाढ देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अस्थायी २०२१/५५२/प्र.क्र.१३०/ कु.क.

१० वा मजला, बी विंग, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, लो.टि. मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीख: २५ मार्च, २०२२

वाचा -

१) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांकः अस्थायी -२०२०/५५२/प्र.क्र.१३०/ कु.क., दि. २३/०९/२०२१
२) संचालक, आरोग्य सेवा (२), पुणे यांचे पत्र क्रमांकः संआसे/आस्था/संकीर्ण प्रयोजनार्थ/३७पदे/कक्ष २ क/न.क्र.७१/४१६२-६३/२०२२, दि. १९/०१/२०२२.
३) वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांकः पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आपुक, दि.२२/०२/२०२२.

प्रस्तावना -

कुटुंब कल्याण कार्यक्रमांच्या अंमलबजावणीकरीता कार्यरत असलेल्या ३७ अस्थायी पदांना दि. २३/०९/२०२१ च्या शासन निर्णयान्वये दि. ०१/०९/२०२१ ते २८/०२/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर ३७ अस्थायी पदांना दि. ०१/०३/२०२२ ते २८/०२/२०२३ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.२ अन्वये शासनास प्राप्त झाला आहे. संदर्भ क्र.३ अन्वये वित्त विभागाने प्रशासकीय विभागातील मंजूर अस्थायी पदांना दि. ०१/०३/२०२२ ते ३१/०८/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यास मंजूरी दिली आहे. त्यानुषंगाने सदर ३७ अस्थायी पदांना दि. ०१/०३/२०२२ ते ३१/०८/२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रमांतर्गत २२११ लेखाशीर्षाखाली कार्यरत असलेल्या पुढील विवरणपत्रात नमूद ३७ अस्थायी पदांस दि. ०१/०३/२०२२ ते ३१/०८/२०२२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | सुधारित वेतन मॅट्रीक्समधील वेतनस्तर | अस्थायी पदांची संख्या |
|---|---|---|---|
| १ | सहसंचालक, आरोग्य सेवा,(वर्ग -१) | S-२६:८२२००-२११५०० | १ |
| २ | उप संचालक, आरोग्य सेवा, (वर्ग -१) | S-२५:५८८००-२०९२०० | २ |
| ३ | सांख्यिकी अधिकारी | S-१५:४१८००-१३२३०० | १ |
| ४ | उच्च श्रेणी लघुलेखक | S-१५:४१८००-१३२३०० | १ |
| ५ | सहाय्यक अधिक्षक | S-१३:३५४००-११२४०० | ४ |
| ६ | वाहन चालक | S-६:१९९००-६३२०० | ४ |
| ७ | सहाय्यक जिल्हा आरोग्य अधिकारी, कुटुंब कल्याण माताबाल संगोपन आणि शालेय आरोग्य, (वैद्यकीय) (वर्ग-१) | S-२३:६७७००-२०८७०० | २३ (१७ जिल्हास्तर व ६ राज्यस्तर) |
| ८ | सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, मुंबई (वर्ग-१) | S-२३:६७७००-२०८७०० | १ |
| **एकूण** | | | **३७** |

३. उपरोक्त विवरणपत्रातील नमूद ३७ पदांवरील खर्च पुढील लेखाशीर्षा अंतर्गत भागविण्यात येईल. सदर पदांवरील खर्चाची तरतूद सन २०२२-२३ या आर्थिक वर्षासाठी मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीतून केली जाईल.

१) अ.क्र. १ ते ६ मधील नमुद पदांकरिता लेखाशिर्ष:-

मागणी क्र. आर-१, मुख्यलेखाशिर्ष-२२११ - कुटुंब कल्याण, ००१- संचालन व प्रशासन, (०१) **राज्य कुटुंब कल्याण केंद्र, १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना** - (०१) (०२), **राज्य कुटुंब कल्याण केंद्र** (२२११ ००३१)

२) अ.क्र. ७ व ८ मधील नमुद पदांकरिता लेखाशिर्ष :-

मागणी क्र. आर-१, मुख्यलेखाशिर्ष - २२११, कुटुंब कल्याण, ००१- संचालक व प्रशासन, (०१) कुटुंब कल्याण केंद्र, १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना, (०१) (०३) जिल्हा कुटुंब कल्याण केंद्र (२२११ ००५१)

४. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि.२२/०२/२०२२ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२५१८२४०१३२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nilesh Madhukar Falke

Digitally signed by Nilesh Madhukar Falke
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9b937361525edcb194dec2d7985fb077e5abd6b9fad45b976539bce4d36b0b69, cn=Nilesh Madhukar Falke
Date: 2022.03.28 10:23:54 +05'30'

**(निलेश फाळके**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र -१/२ (लेखापरीक्षा/(लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२. अधिदान व लेखा कोषागार, मुंबई.
३. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, पुणे
६. जिल्हा कोषागार अधिकारी , पुणे
७. वित्त विभाग(व्यय-१३) मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती ( कु.क.).